**प्रकल्पांच्या जलाशयातील गाळ सर्वेक्षण तसेच लाभक्षेत्रातील पीक मोजणी इत्यादी सुदूर संवेदन पध्दतीने व G.P.S. पध्दतीने सर्वेक्षणाची सर्व कामे महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, (मेरी) नाशिक मार्फत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन परिपत्रक, क्र. जीपीएस-१०१०/(२०८/१०)/लाक्षेवि (आस्था)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मे,२०११

## परिपत्रक

महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, (मेरी) नाशिक या संस्थेतंर्गत कार्यरत असलेल्या सुदूर संवेदन व भूमाहितीशास्त्र विभागातंर्गत उपग्रहीय प्रतिमावर विविध प्रकारची विश्लेषणात्मक कामे केली जातात. तसेच पाटबंधारे प्रकल्पांच्या जलाशयातील गाळाचे अनुमान काढणे व लाभक्षेत्रातील पीकांची मोजणी करणे या कामांकरिता आवश्यक माहिती गोळा करुन ती संगणक प्रणालीद्वारे पृथःकरण देखील संस्थेमार्फत करण्यात येते. या प्रकारची सर्व कामे करण्याकरिता संस्थेकडे अद्ययावत असे High Precision G.P.S. प्रणाली उपलब्ध असून या प्रणालीद्वारे आवश्यक माहिती अगदी सें.मी./मि.मी. अचूकतेने गोळा करता येते व ही माहिती G.I.S. संगणक प्रणालीमध्ये समाविष्ट करता येते. इतक्या अचूकतेने माहिती प्राप्त होत असल्यामुळे मोठया प्रदेशावरील कंटूर सर्व्हे करता येणे देखील शक्य आहे.

या अद्ययावत उपकरणांची मोठया प्रमाणात उपयुक्तता असल्याचे निदर्शनास आल्यामुळे महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्थेला सदर उपकरणे खरेदी करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. तरी या परिपत्रकाद्वारे सूचना देण्यात येत आहेत की, वर नमुद केल्याप्रमाणे आपल्या अखत्यारीतील प्रकल्पांबाबतची कामे ही महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी) नाशिक यांच्याकडूनच करुन घेण्यात यावी.

हे शासन परिपत्रक शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०११०५२७१२०८४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सं.अ.टाटू )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रतः-

सचिव, जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, जलसंपदा (लाक्षेवि) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, (कृ.मा.प.)
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे,
महासंचालक, मेरी, नाशिक,
महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद,
सर्व मुख्य अभियंता,
सर्व अधीक्षक अभियंता,
जलसंपदा विभागातील सर्व सह/उप सचिव/अवर सचिव,
जलसंपदा विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती.